**प्रधानमंत्री किसान ऊर्जा सुरक्षा एवं उत्थान महाअभियान (कुसुम) योजना अंतर्गत महाऊर्जाला सर्वसाधारण घटकाच्या सौर कृषिपंपांच्या लाभार्थ्यांच्या शासन हिस्स्यापोटी सन २०२१-२२ मध्ये अनुदान वितरित करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सौरप्र-२०२१/प्र.क्र. २२७/ऊर्जा-७.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २० जानेवारी, २०२२.

**वाचा :-**

१) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.सौरप्र-२०१४/प्र.क्र.२१९/ऊर्जा-७, दि.२७.०३.२०१५ व दिनांक १४.०६.२०१७
२) शासन निर्णय, उद्योग उर्जा व कामगार विभाग क्र. सौरप्र-२०१९/ प्र.क्र.२६८/ऊर्जा-७, दिनांक १२ मे, २०२१
३) शासन निर्णय, उद्योग उर्जा व कामगार विभाग क्र. बीयुडी-२०१९/प्र.क्र. ६०/ऊर्जा-७, दिनांक १२ जुलै, २०२१
४) महाऊर्जाचे पत्र क्र. आर.ई.एन./कुसुम योजना/२०२०-२१/सौर/४२२०, दि. १५ सप्टेंबर, २०२१
५) महाऊर्जाचे पत्र क्र. आर.ई.एन./कुसुम योजना/२०२०-२१/सौर/५११०, दि. १० डिसेंबर, २०२१

**प्रस्तावना :-**

राज्यातील कृषीपंप वीज जोडण्यांचे सौर ऊर्जेद्वारे विद्युतीकरण करण्याच्या अभियानांर्तगत केंद्र शासनाच्या नवीन व नवीकरणीय ऊर्जा मंत्रालय, नवी दिल्ली यांचेकडून शेतकऱ्यांसाठी प्रधानमंत्री किसान ऊर्जा सुरक्षा एवंम उत्थान महाभियान (कुसुम) देशभरात राबविण्यात येत आहे. या अभियानाच्या घटक ब (Componant B) अंतर्गत एकूण १,००,००० पारेषण विरहीत सौर कृषीपंप मंजूर केले असून त्याची अंमलबजावणी महाऊर्जाद्वारे करण्यात येत आहे.

वित्तिय वर्ष २०१९-२० साठी राबविण्यात आलेल्या निविदेतील पात्र पुरवठादारांपैकी ९ पुरवठादारांनी ३८०० सौर पंप आस्थापित करण्यास मान्यता दिली होती. सुकाणू समितीच्या दि. २ सप्टेंबर, २०२१ रोजीच्या बैठकीत सहमती दिल्यानुसार ९ पुरवठादारांमार्फत ३८०० सौर कृषी पंप आस्थापित करण्यासाठी कार्यादेश निर्गमित केले. परंतु, कार्यादेश निर्गमित केलेल्या ९ पुरवठादारांपैकी २ पुरवठादारांनी स्विकृती न दिल्याने ७ पुरवठादारांमार्फत एकूण २७५० सौर कृषिपंप आस्थापित करण्याचे निश्चित करण्यात आले असून पंप आस्थापनेची कार्यवाही चालू आहे.

सर्वसाधारण गटाच्या लाभार्थ्यांकरीता राज्य शासनाच्या अर्थसंकल्पिय अनुदानातून १० टक्के हिस्सा देण्यात येणार असून १० टक्के लाभार्थी हिस्सा, ३० टक्के केंद्र शासनाचे परस्पर प्राप्त होणारे अर्थसहाय्य व उर्वरित ३० टक्के महावितरण कडील एस्क्रो खात्यात वाढीव वीज विक्रीवरील करामधून परस्पर जमा होणाऱ्या रक्कमेतून शासन मान्यतेनुसार अदा करण्यात येणार आहे. शासन निर्णयानुसार २७५० नग सौर कृषीपंपाच्या सर्वसाधारण गटाच्या लाभार्थ्यांचा राज्य शासनाच्या अनुदानाचा १० टक्के हिस्सा उपलब्ध करुन द्यावयाचा आहे.

सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता “मागणी क्रमांक. के-६, मुख्य लेखाशीर्ष-२८१०- सौर कृषीपंप योजना” याखाली रु.२५०.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. महाराष्ट्र विद्युत वितरण कंपनीच्या निधीच्या आवश्यकतेनुसार मुख्यमंत्री सौर कृषि पंप योजनेतील सर्वसाधारण घटकाच्या लाभार्थ्यांच्या

शासन हिस्स्यापोटी सन २०२१-२२ मध्ये रुपये ४६.५४ कोटी (रुपये शेहचाळीस कोटी चोपण्ण लाख फक्त) अनुदान महावितरणला रोखीने वितरीत करण्यात आले असून आता प्रधानमंत्री किसान ऊर्जा सुरक्षा एवंम उत्थान महाभियान (कुसुम) या अभियानाच्या घटक ब (Componant B) अंतर्गत एकूण २७५० पारेषण विरहीत सौर कृषीपंपातील १० टक्के शासन हिस्सा रु. ४.५८ कोटी महाऊर्जाला उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

राज्यातील कृषीपंप वीज जोडण्यांचे सौर ऊर्जेद्वारे विद्युतीकरण करण्याच्या अभियानांर्तगत केंद्र शासनाच्या नवीन व नवीकरणीय ऊर्जा मंत्रालय, नवी दिल्ली यांचेकडून शेतकऱ्यांसाठी प्रधानमंत्री किसान ऊर्जा सुरक्षा एवंम उत्थान महाभियान (कुसुम) देशभरात राबविण्यात येणाऱ्या अभियानाच्या घटक ब **(Componant B)** अंतर्गत मंजूर एकूण १,००,००० पारेषण विरहीत सौर कृषीपंपापैकी आस्थापित करावयाच्या २७५० पारेषण विरहीत सौर कृषीपंपातील १० टक्के शासन हिस्सा रु. ४.५८ कोटी महाऊर्जाला वितरित करण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत असून सदर निधी त्यांना उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. सदर रक्कम अदा करण्यासाठी श्री. उ. द. वाळुंज, सह सचिव (ऊर्जा), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी व श्री. ना. रा. ढाणे, अवर सचिव, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सौर उर्जा कृषिपंप बसविण्याचा कार्यकम अंतर्गत विविध योजनेवरील खर्चाचा, उद्दिष्टे व प्रत्यक्ष साध्यता याबाबतच्या माहितीसह मासिक व त्रैमासिक अहवाल लगतच्या महिन्याच्या १० तारखेपर्यंत महाऊर्जाने शासनास सादर करण्यात यावा. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या निधीची रक्कम केवळ "कुसुम" अंतर्गत सौर उर्जा कृषिपंप बसविण्याचा कार्यकमाच्या अंमलबजावणीसाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी खर्च करण्यात येईल याची महाऊर्जाकडून खातरजमा करण्यात यावी.

४. सदर निधीच्या लेख्यासंबंधीची कागदपत्रे, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (MEDA), औंध रोड, स्पायसर कॉलेज समोर, पशुसंवर्धन आयुक्तालया शेजारी, औंध, पुणे यांनी आवश्यक तेव्हा महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई यांच्याकडे तपासणीसाठी सादर करावीत.

५. याबाबतचा खर्च "मागणी क्रमांक-के-६, २८१०, नवीन व नवीकरणीय ऊर्जा, ०२, सौर १०२, प्रकाश होल्ट, (०१) सौर उर्जा कृषिपंप बसविण्याचा कार्यकम (०१)(०१) सौर वीजेवरील कृषि पंप बसविण्यासाठी सहायक अनुदान (कार्यक्रम) (राज्य हिस्सा), ३३ अर्थ सहाय्य (२८१००९०२)" या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

६. सौर उर्जा कृषिपंप बसविण्याचा कार्यकम अंतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी सदर निधीच्या लेख्यासंबंधीची कागदपत्रे, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (MEDA), औंध रोड, स्पायसर कॉलेज समोर, पशुसंवर्धन आयुक्तालया शेजारी, औंध, पुणे यांना निधी वितरीत करतांना वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थस-२०२१/प्र. क्र. ४८/अर्थ-३, दिनांक २४ जुन, २०२१ च्या परिशिष्टातील तपासणी अटीची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १३४/१४६१, व्यय-१६, दि. १०.११.२०२१ अन्वये व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ०१/२०२२,

व्यय-१६, दि. ११.०१.२०२२ अन्वये मान्यता दिल्यानुसार प्रशासकीय विभागाच्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१२०१७२८३२०७१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANASAHEB RAJARAM DHANE

Digitally signed by NANASAHEB RAJARAM DHANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a71698611123263cde9d32423e9bb73044d91ed0cffad3b6267198ee5014159f, pseudonym=5DD23ACB82750B55FAC0D076A47198885E07A4B6, serialNumber=6C39E2858150DBDFCFE6CD25ED08ADF59F4D2FD8C1EDE1730735F604904BF3BB, cn=NANASAHEB RAJARAM DHANE
Date: 2022.01.20 17:32:19 +05'30'

**( ना. रा. ढाणे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. सर्व मंत्री / सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४. सर्व विधानमंडळ सदस्य,विधान भवन, मुंबई,
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
६. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांचे स्वीय सहायक,सर्व मंत्रालयीन विभाग,
१०. सर्व विभागीय आयुक्त,
११. सर्व जिल्हाधिकारी,
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा,
१३. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
१४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१५. सचिव, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, मुंबई (पत्राने),
१६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, सूत्रधारी कंपनी मर्या.,मुंबई,
१७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या.,मुंबई,
१८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्या.,मुंबई,
१९. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या.,मुंबई,
२०. महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा),पुणे,
२१. उप सचिव/ ऊर्जा-३, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२. ऊर्जा उप विभागातील सर्व कार्यासने,उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
२३. निवड नस्ती,ऊर्जा-७, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.